**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत नव्याने मंजूर करण्यात आलेल्या १०२ प्रकल्पांच्या बाल विकास प्रकल्प अधिकारी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-एबावि-२००८/प्र.क्र.२३१/का-६
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक :- २९ ऑक्टोंबर, २००९

**वाचा :-** १) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र. एबावि-२००८/प्र.क्र.२३१/का.६, दिनांक १६ जुलै, २००९

२) महालेखापाल कार्यालय, मुंबई, महाराष्ट्र राज्य, यांचे क्र.टीएम/सीच-२/डीडीओ/डब्ल्यूॲण्डसीडी/०९-१०/१०७३, दिनांक २६.१०.२००९ चे पत्र.

**शासन निर्णय :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत वाचा क्र.१ येथील दिनांक १६ जुलै, २००९ च्या शासन निर्णयानुसार अतिरिक्त १०२ प्रकल्प (६७ ग्रामीण, १९ आदिवासी व १६ नागरी) नव्याने मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या नव्याने मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांच्या बाल विकास प्रकल्प अधिकारी यांना कोषागारातून प्रकल्पाच्या वित्तीय व्यवहारासाठी / कामकाजासाठी येणा-या अडचणी दूर करण्यासाठी महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड १ मधील नियम १५ (३) मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचे अधिकार केवळ वित्तीय अधिकारापुरते मर्यादित राहतील.

प्रस्तुत शासन निर्णय, महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ खंड १ मधील नियम १५ (३) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व सचिव (महिला व बाल विकास) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
(ज. कि. मगरे)
सह सचिव

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,रायगड भवन,नवी मुंबई,

महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
महासंचालक, महिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण),
सहायक संचालक, (वित्त व लेखा) एबाविसेयो, कोकण भवन, नवी मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग/व्यय-६ मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
अवर सचिव / कार्या-४ (अर्थसंकल्प) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (कार्यासन ६)